Convertion in Regular Temparary Establishment:- Shri Ramchandra N. Shinde working under Bhima kalwa Mandal, Solapur

कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण-- **श्री. रामचंद नाना शिंदे भिमा उजवा कालवा, सोलापूर**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. एसयुटी-२०१०/ (५६/२०१०)/आ(कामगार)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ६/६/२०११

**पहावे** :- १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग रु.अ.आ.१५९६/२२८/ सेवा-५, दि.२४.४.२००१
२) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर. यांचे पत्र जा. क्र. पशा/आ.३/३७५६/१० दिनाक ७/६/२०१०.

**प्रस्तावना:**

अधिक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांच्या नियंत्रणाखालील विभागीय कार्यालय, यांनी श्री. रामचंद नाना शिंदे यांची दि १९.४.८० रोजी रोजंदारी आस्थापनेवर हवादाब यंत्रचालक कामगार म्हणून नियुक्ती केली होती. त्यांचे कर्तव्य काळात कंपनीची बॅटरी चोरीस गेली त्यामुळे त्यांना सर्वस्वी जबाबदार धरुन त्याचेविरुध्द विभागीय चौकशीत दोषी आढळल्याने त्यांना दि. २५.३.८५ रोजी कामावरुन कमी करण्यात आले. त्यामुळे त्यांनी सेवेत पुन्हा घेण्याबाबत मा. कामगार न्यायालय, सोलापूर येथे दावा क्रः १६६/८५ दाखल केला. सदर दावा दि १७.१२.९७ रोजी फेटाळण्यात आला. सदर दाव्याविरुध्द श्री. शिंदे यांनी मा. औद्योगिक न्यायालय येथे ४/९८ दाखल केला. तथापि सदर दावा न्यायालयीन अधिकार कक्षेत येत नाही असा शेरा देऊन दप्तरी दाखल केला गेला. त्यामुळे श्री.शिंदे यांनी महा. प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दावा क २५४/०४ दाखल केला. सदर दाव्याचा निकाल दि ९.३.०५ रोजी लागला असता, त्यामध्ये श्री. शिंदे यांना दि. ९.३.०५ पासून एक महिन्याच्या आत पुनःस्थापित करुन, दावा दाखल केलेल्या दि. ३.३.०४ पासून अनुज्ञेय असलेले मागील वेतन व भत्यातील फरकाची रक्कम अदा करणेबाबत तसेच त्यांचा वेतन निश्चितीचा फायदा देण्याबाबत व त्यांना कमी केल्यापासून ( दि २५.३. ८५) ते सेवेत पुनःस्थापित ( दि १६.४.०५ ) करेपर्यंतच्या कालावधीतील त्यांची सेवाजेष्ठता अबाधित ठेवण्याबाबत आदेश देण्यात आला. तसेच त्यांची विभागीय चौकशी करावयाची असल्याबाबतची परवानगी देण्यात आली. सदर न्याय निर्णयाविरुध्द कायदा सल्लागार तथा महा. प्रशासकीय न्यायाधिरण, मुंबई यांनी दिलेल्या निर्णयानुसार श्री. शिंदे यांना सेवेत पुनःस्थापित करुन दि. ३.३.०४ ( दावा दाखल ) पासून त्यांना अनुज्ञेय असलेले मागील वेतन व भत्यातील फरकाची रक्कम अदा करणेबाबत तसेच त्यांचा वेतन निश्चितीचा फायदा देण्याबाबतची तथा विभागीय चौकशी बंद करण्यात आली आहे. उर्वरित सेवाज्येष्ठता अबाधित ठेवण्याबाबतची कार्यवाही प्रलंबित आहे. दरम्यानच्या कालावधीत श्री. शिंदे यांनी त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत तथा त्यांचेवरील विभागीय चौकशी संदर्भात मा. प्रशासकीय न्यायाधिकरण , मुंबई येथे मूळ अर्ज क्र ३३७/१० दाखल केला. सदर अर्जाचा क्रमांक बदलून त्याचा सुधारित दावा क्र. ८४४/१० करण्यात आला व सुधारीत दाव्याचा निर्णय दि १४.२.११ रोजी लागला

असता, त्यामध्ये श्री. शिंदे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याच्या प्रस्तावावर विभागाने तीन महिन्याच्या आत करावी असा आदेश दिला. त्यामुळे दि. ९.३.०५ च्या आदेशानुसार उर्वरित कार्यवाही करण्यासाठी श्री. शिंदे यांना कालेलकर करारातील तरतूदीप्रमाणे हवादाब यंत्रचालक या पदावर रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. शिंदे यांची दि ७.११.८२ पासून एका वर्षाच्या कालावधीत एकूण २४० दिवस इतकी सेवा झाली आहे. शासन निर्णय दि २४.४.२००१ मधिल तरतुदीनुसार श्री. शिंदे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा दिनांक ( ७.११.८७ ) हा दिनांक ३१.१२.९८ पूर्वीचा आहे. सदर प्रकरणी महाराष्ट् प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्या दि. ९.३.०५ च्या निर्णयाची अंमलबजावणी करणे आवश्यक असल्याने श्री. रामचंद नाना शिंदे यांना खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. रामचंद नाना शिंदे | रोजंदारी | हवादाब यंत्रचालक ७.११.८२ | ७.११.८७ | हवादाब यंत्रचालक | रु ९५०-१४०० (जुनी ) रु.३०५०-४५९० (५ वा वेतन आयोग) रु.५२००-२०२०० (६ वा वेतन आयोग ) |

३ श्री. रामचंद नाना शिंदे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

४. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी

आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

५. श्री. रामचंद नाना शिंदे यांना हवादाब यंत्रचालक या पदावर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्यास न्यायनिर्णयानुसार दि. ३.३.०४ पासून पुनःस्थापित करण्याच्या कालावधी पर्यंतची (दि १६.४.०५) त्यांना अनुज्ञेय असलेली वेतनातील थकबाकीची अदा केलेली रक्कम वजा करता उर्वरित रक्कम संबंधित कर्मचा-यांस रोखीने द्यावयाची असून ती धनादेशाद्वारे (Cheque ) अदा करण्यात यावी.

६. तसेच श्री.शिंदे यांची वेतन निश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. सदर कर्मचा-यावर वेतनापोटी होणारा खर्च सन २०११-१२ या आथीक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक : २०११०६०६१११०५६००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबतः प्रपत्र ब

(अ.अ. कोदे)

**( अ.अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र - २ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
अधिक्षक अभियंता, भिमा कालवा मंडळ क ९ मंगळवेढा, सोलापूर
कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क: ९ मंगळवेढा
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.